शासकीय औषधनिर्माणशास्त्र महाविद्यालयातील अध्यापकांच्या सन २०१४ च्या सर्वसाधारण बदल्या

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः उवतंशि/तांशि-१/४३/११/७८/२०१४**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २ ऑगस्ट २०१४.

**वाचा :**

१) महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५

२) संचालक, तंत्रशिक्षण, मुख्य कार्यालय, मुंबई यांचे क्र. ४/आस्था/नियतकालिक बदल्या /औनिशा/२०१४/१४०, दि. १२/०५/२०१४ चे पत्र व त्यासोबतची सहपत्रे.

**शासन निर्णय :**

महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार तंत्र शिक्षण संचालनालयाच्या आस्थापनेवरील महाराष्ट्र अभियांत्रिकी महाविद्यालयीन सेवा गट - अ या सेवेतील शासकीय औषधनिर्माणशास्त्र महाविद्यालयातील अध्यापकांच्या सन २०१४ च्या सर्वसाधारण बदल्या खालीलप्रमाणे करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | अध्यापकांचे नाव व कार्यरत संस्था | बदलीचे ठिकाण | बदलीचे कारण |
|---|---|---|---|
| १ | श्री. आर.एफ़.फ़ारुकी सहयोगी प्राध्यापक, औषधनिर्माणशास्त्र, शासकीय औषधनिर्माणशास्त्र महाविद्यालय, औरंगाबाद | शासकीय औषधनिर्माणशास्त्र महाविद्यालय,कराड येथील सहयोगी प्राध्यापक, औषधनिर्माणशास्त्र या रिक्त पदावर | प्रशासकीय बदली |
| २ | डॉ. आर.बी. नवले, सहाय्यक प्राध्यापक, शासकीय औषधनिर्माणशास्त्र महाविद्यालय, औरंगाबाद | शासकीय औषधनिर्माणशास्त्र महाविद्यालय, रत्नागिरी, येथील सहाय्यक प्राध्यापक, औषधनिर्माणशास्त्र या रिक्त पदावर | प्रशासकीय बदली |
| ३ | डॉ. आय.डी.गोंजारी, सहाय्यक प्राध्यापक, शासकीय औषधनिर्माणशास्त्र महाविद्यालय, औरंगाबाद | शासकीय औषधनिर्माणशास्त्र महाविद्यालय, रत्नागिरी, येथील सहाय्यक प्राध्यापक, औषधनिर्माणशास्त्र या रिक्त पदावर | प्रशासकीय बदली |

२. महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्यांच्या मंजूरीने सदर बदल्या करण्यात येत आहेत.

३. उपरोक्त प्रमाणे प्रशासकीय बदली झालेल्या अध्यापकास शासन नियमानुसार पदग्रहण अवधी, प्रवास भत्ता व दैनिक भत्ता अनुज्ञेय असणार आहे.

४. सदर आदेश तात्काळ अंमलात येतील. बदली झालेल्या अध्यापकांना संबधित संस्थेने तात्काळ कार्यमुक्त करावे. तसेच बदली झालेल्या अध्यापकांनी त्यांची पदस्थापना करण्यात आलेल्या संस्थेत तात्काळ रुजू व्हावे. पदस्थापनेत बदल करण्यासंबंधिच्या कोणत्याही विनंतीची दखल घेण्यात येणार नाही. बदली झालेल्या उपरोक्त अध्यापकांची कोणतीही रजा शासनाच्या पूर्व मान्यतेशिवाय मंजूर करण्यात येणार नाही. बदली झालेल्या अधिकाऱ्यास तात्काळ कार्यमुक्त करण्याची जबाबदारी वैयक्तीक रित्या संबंधित संस्था प्रमुखांची राहील. याबाबतचा पाठपुरावा संबंधित विभागीय सहसंचालकांनी करावा. तसेच याबाबत कार्यपालन अहवाल या आदेशाच्या दिनांकापासून ०१ महिन्यात संचालकांनी शासनास सादर करावा.

५. सदर बदली आदेशाची प्रभावीपणे अमंलबजावणी होणे गरजेचे असल्यमुळे बदली झालेल्या अधिकाऱ्याचे कार्यमुक्ततेच्या दिनांकापर्यतचे अथवा जास्तीत जास्त दिनांक ०१/०९/२०१४ पर्यतचे वेतन ते सध्या कार्यरत असलेल्या संस्थेने काढावे. दि. ०२/०९/२०१४ पासूनचे वेतन कोणत्याही परिस्थितीत बदलीपूर्वीच्या संस्थेकडून काढण्यात येऊ नये, सदर वेतन संबंधित अध्यापक बदलीच्या संस्थेत रुजू झाल्यानंतर बदली नंतरच्या संस्थेने काढावे. दि. ०२/०९/२०१४ पासूनचे वेतन बदलीपूर्वी कार्यरत असलेल्या संस्थेतील आहरण व संवितरण अधिकाऱ्याने अदा केल्यास त्यांना व्यक्तीशः जबाबदार धरण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८०२१५०५५००९०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sudhir Panditrao Shastri

Digitally signed by Sudhir Panditrao Shastri
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Higher & Technical Education, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sudhir Panditrao Shastri
Date: 2014.08.02 15:04:00 +05'30'

(सुधीर पं. शास्त्री)

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. संबंधित अध्यापक, (संस्था प्रमुखामार्फत)

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय मुंबई
२. मा. मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण( यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई
३. मा. राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण( यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई
४. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय विस्तार, मुंबई
५. संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. सहसंचालक, तंत्र शिक्षण, विभागीय कार्यालय, मुंबई /पुणे / औरंगाबाद.
७. संबंधित संस्था प्रमुख (संचालक, तंत्र शिक्षण संचालनालयामार्फत)
८. संबंधित संस्था प्रमुख (संचालक, तंत्र शिक्षण संचालनालयामार्फत)
९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षक( मुंबई / नागपूर, महाराष्ट्र १ /२
१०. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी
११. निवड नस्ती तांशि -१